**विभाग प्रमुख, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ यांच्या बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. बदली-४३१८/प्र.क्र.०३/१८/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १० सप्टेंबर, २०१८.

**वाचा :** १) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचा दि. ०२/०८/२०१८ रोजीचा ई-मेल.
२) श्री. राजेश चौधरी यांचे दि. १५/०४/२०१८ रोजीचे निवेदन.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय तंत्रनिकेतनातील खालील विवरणपत्रात नमूद विभाग प्रमुख यांची बदली करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत संस्था | बदली करण्यात आलेली संस्था | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. राजेश गंगाधरराव चौधरी, विभाग प्रमुख, यंत्र अभियांत्रिकी. | शासकीय तंत्रनिकेतन, बीड. | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर. | वैद्यकीय कारणास्तव विनंती बदली |

०२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त बदली विनंतीनुसार करण्यात आली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.
२) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित विभाग प्रमुखांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेतून तात्काळ त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या संस्थेत रुजु व्हावे. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी पर्यायी विभाग प्रमुख हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या विभाग प्रमुखास तात्काळ कार्यमुक्त करावे.
३) बदली झालेले विभाग प्रमुख त्यांच्या संबंधित संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजु होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजु करुन घ्यावे.
४) बदली झालेल्या विभाग प्रमुखांची कोणतीही रजा प्रशासकीय विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.
५) बदली झालेले अधिकारी कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रूजु झाल्याबाबतची माहिती संचालनालयाने या विभागास कळवावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०९१०१४४१२७४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.09.10 14:45:21 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :** श्री. राजेश गंगाधर चौधरी, विभाग प्रमुख, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, बीड (संस्थेमार्फत).

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,औरंगाबाद/ नागपूर,
७. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, बीड/ नागपूर, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई/ नागपूर,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड/ नागपूर,
१०. निवड नस्ती-तांशि-७.